**शासकीय तंत्रनिकेतनातील हंगामी व कंत्राटी स्वरूपात कार्यरत असलेल्या ३१७ अध्यापकांच्या सेवा नियमित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक: न्यायाप्र-२८१५/प्र.क्र.३४/२०१५(भाग-४)-१/तांशि -७**
मंत्रालय विस्तार भवन, ४ था मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १० डिसेंबर, २०१९

वाचा -

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय शासन निर्णय क्रमांक: न्यायाप्र-२८१५/ प्र.क्र.३४/२०१५ (भाग-४) १/तांशि-७, दि. १३ मार्च, २०१५.
२. तंत्र शिक्षण संचालनालयाचे पत्र क्रमांकः ४अ/आस्था/न्याप्र/२०१६/७७, दि. २५ जानेवारी, २०१६.
३. या विभागाचे पत्र क्र.न्यायाप्र-२८१६/प्र.क्र.०८/१६/तांशि-७, दि.१७ फेब्रुवारी, २०१६.
४. तंत्र शिक्षण संचालनालयाचे पत्र क्रमांकः ४अ/आस्था/२०१९/५६५, दि. २६ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

शासकीय तंत्रनिकेतने आणि तत्सम संस्थांमध्ये कार्यरत श्री. सचिन डवले व इतर कंत्राटी /हंगमी अध्यापकांनी त्यांच्या सेवा नियमित करण्याबाबत दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२०४६/२०१० मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर सेथे दाखल केली होती. सदर न्यायालयीन प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने, दि.१९ ऑक्टोबर, २०१३ रोजी ज्यांची सलग सेवा ३ वर्ष झालेली आहे व दि.१५ ऑक्टोबर, २०१३ रोजी जे सेवेत कार्यरत आहेत त्यांची कंत्राटी सेवा नियमित करण्याचे आदेश दिले. तद्नंतर संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासकीय तंत्रनिकेतनातील हंगामी व कंत्राटी स्वरूपात कार्यरत असलेल्या ३१७ अध्यापकांच्या सेवा नियमित करण्यात आलेल्या आहेत. त्यापैकी अ.क्र.२५ येथील श्री. अजय सुरेश भगत यांच्या कंत्राटी सेवा दि.२७ ऑक्टोबर, २००३ पासून नियमित करण्यात आल्या आहेत. तथापि, ते सदर दिनांकापासून सलग सेवेत नसल्याची बाब लक्षात आल्याने व त्यांच्या सलग सेवेच्या दिनांकापासून त्यांच्या सेवा नियमित करणे आवश्यक असल्याने, त्यांच्या रूजू दिनांकात करावयाच्या बदलाच्या अनुषंगाने शुध्दीपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शुद्धीपत्रक :-**

तंत्रशिक्षण संचालनालयाने संदर्भाधीन क्र.२ व ४ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील अ.क्र.२५ समोरील “स्तंभ-६ व ७” खाली नमुद “दि.२७ ऑक्टोबर, २००३” ऐवजी **“दि. ०४ डिसेंबर, २००७”** असा वाचण्यात यावा.

०२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१२१०१५४५५१४६०८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2019.12.10 15:50:33 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिव्याख्याता ( तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१. सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई,
२. संचालक,तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,नागपूर ( तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
४. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत ),
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर ( तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
७. निवड नस्ती /तांशि-७.